**कोविड-१९ विषाणूच्या प्रादुर्भावाच्या माहे सप्टेंबर २०२० ते फेब्रुवारी २०२१ कालावधीतील परिवहन सेवेची (ॲम्ब्युलन्स) प्रलंबित देयक अदा करण्यासाठी ठाणे, महानगरपालिका, ठाणे यांस निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मदत व पुनर्वसन विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२४/प्र.क्र. २१८/म-३**
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: १२ मार्च, २०२५

संदर्भ:-

१) आयुक्त तथा प्रशासक, ठाणे महानगरपालिक, ठाणे यांचे पत्र क्र. ठामपा/परिवहन सेवा/ आयुक्त/११५/२०२४, दि.२६.०७.२०२४
२) अतिरिक्त आयुक्त-२. ठाणे महानगरपालिका, ठाणे यांचे पत्र क्र. ठामपापसे/परिवहन सेवा/ ५२६/२०२४, दि.०७.१०.२०२४
३) ठाणे आयुक्त, जा क्र. ठामपापसे/पव्य/३९०/२०२४, दि.०४.११.२०२४ चे पत्र
४) ठाणे आयुक्त, जा क्र. ठामपापसे/पव्य/३९८/२०२४, दि.०७.११.२०२४ चे पत्र
५) मदत व पुनर्वसन विभाग, शासन निर्णय क्र. मदत व पुनर्वसन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२४/प्र.क्र. २१८/म-३, दिनांक ०९/१०/२०२४

प्रस्तावना :-

कोविड-१९ विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी महाराष्ट्र राज्यात साथरोग प्रतिबंधात्मक अधिनियम १८२७ ची अंमलबजावणी सुरु झाली. या अधिनियमातील खंड २.३.४ नुसार राज्यात कोरोना विषाणूमुळे उदभवलेल्या संसर्गजन्य रोगाचा प्रतिबंध व नियंत्रण करण्यासाठी महापालिका आयुक्त हे सक्षम प्राधिकारी म्हणून महापालिका कार्यक्षेत्रासाठी घोषित करण्यात आलेले आहेत. कोरोना विषाणूचा वाढता प्रसार रोखण्यासाठी शासनाने सपूर्ण देशात लॉकडाऊन घोषित केला. कोरोना विषाणूच्या संसर्ग झालेल्या नागरीकाना हॉस्पीटल किंवा विलगीकरण केंद्र येथे घेऊन जाण्याकरीता आरोग्य विभागाकडील तसेच आरोग्य विभागाकरीता अधिग्रहीत केलेल्या खाजगी ॲम्ब्युलन्सची संख्या अपुरी

होती. मार्च व एप्रिल २०२० या महिन्यांमध्ये ठाणे शहरामध्ये आढळणा-या दैनंदिन रुग्णांची संख्या लक्षात घेता आरोग्य विभागास जादा ७० ते ८० ॲम्ब्युलन्सची आवश्यकता भासत होती. ॲम्ब्युलन्सअभावी संसर्ग झालेल्या नागरीकांना हॉस्पिटल किंवा विलगीकरण केंद्र येथे घेऊन जाण्याकरीता प्रतिक्षा करावी लागू नये किंवा त्याची गैरसोय होऊ नये, या कारणास्तव महापालिका आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांनी ठाणे परिवहन उपक्रमाकडून २५ बसेसचे ॲम्ब्युलन्स मध्ये रुपांतर करुन आरोग्य विभागासाठी उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. त्या अनुषंगाने आयुक्त तथा प्रशासक, ठाणे महानगरपालिका, ठाणे यांच्या संदर्भ क्र. ४ येथील दिनांक ०७.११.२०२४ रोजीच्या प्रस्तावानुसार सदर कोविड कालावधीतील (माहे सप्टेंबर २०२० ते फेब्रुवारी २०२१) ॲमब्युलन्समधील रूपांतरीत २५ बससेची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोविड १९ विषाणूच्या साथीच्या माहे सप्टेंबर २०२० ते फेब्रुवारी २०२१ या कालावधीत ठाणे महानगरपालिकेस मे. सिटी लाईफ लाईन प्रा. लि. यांचेमार्फत जी.सी. सी. अंतर्गत चालविण्यात येणाऱ्या २५ बसेसचे रुग्णांची ने-आण करण्यासाठी, ॲम्ब्युलन्स मध्ये रुपांतर करुन आरोग्य विभागासाठी उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. सदरची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी, संदर्भाधीन दिनांक ०९.१०.२०२४ च्या शासन निर्णयानुसार रू.३८८६.६७ लक्ष निधी मंजूर करण्यात आला होता. त्यापैकी आता रू.१,२०,९१,८७७/- (रूपये एक कोटी वीस लाख एक्क्याण्णव हजार आठशे सत्तयाहत्तर फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी म- ११ कार्यासनाने उपलब्ध करुन देण्यात यावा. तसेच त्यानंतर सदर निधी आहरीत करण्यासाठी लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी खर्च करताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

अ) कोविड १९ विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी अन्य योजनामधून सदर बाबीसाठी निधी प्रस्तावित केलेला नाही अथवा खर्च केलेला नाही तसेच, परिगणना अचूक केल्याबाबत आयुक्त

तथा प्रशासक, ठाणे महानगरपालिका, ठाणे यांनी खातरजमा करावी जेणेकरुन निधीबाबत व्दिरुक्ती होणार नाही याची आयुक्त तथा प्रशासक, ठाणे महानगरपालिका, ठाणे कार्यालयाने कटाक्षाने काळजी घ्यावी.

ब) सदर देयकाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल/शासनास सादर करण्यात यावे.

४. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात लेखाशीर्ष २२४५-००७५ अंतर्गत, ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) मधून पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध होणाऱ्या मागणी क्र. सी-६, मुख्य लेखाशीर्ष २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च. (२२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांव्यतिरिक्त खर्च, (९२) (०३) कोव्हीड-१९ प्रादुर्भाव टोखण्यावरील खर्च (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ ४१५२) या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५१३/२०२४/व्यय-९, दि.१६.१०.२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३१२१५२६३६३६१९ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2025.03.12 15:28:09 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई
२. अप्पर मुख्य सचिव, (सार्वजनिक आरोग्य विभाग), जी.टी. हॉस्पिटल, मुंबई.
३. विभागीय आयुक्त, कोकण.
४. जिल्हाधिकारी, ठाणे

५. आयुक्त तथा प्रशासक, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
६. अपर मुख्य सचिव, (मदत, पुनर्वसन व आपत्ती व्यवस्थापन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. वित्तीय सल्लागार व सहसचिव, मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक. लेखा व कोषागारे, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे.
१०.लेखाधिकारी (आव्यप्र-६), महसूल व वन विभाग मंत्रालय, मुंबई.
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) ½ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
१२.कार्यासन अधिकारी (ब-१/म-११/आव्यप्र-१), मदत व पुर्नवसन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.वित्त विभाग,(व्यय-९/अर्थ-६) मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती (कार्यासन/म-३)